**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ‘शासन आपल्या दारी’ या उपक्रमांतर्गत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाद्वारे जाहिरात व प्रसिद्धीसाठी येणाऱ्या खर्चास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. मावज-२०२३/प्र.क्र.१३२/कार्या-३४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ मे, २०२३.

__वाचा:__ १) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.मावज-२०२०/प्र.क्र.३३/कार्या-३४.दि१६. मार्च २०२०
२) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.मावज-२०१८/प्र.क्र.२३९/कार्या-३४, दि.२६ मार्च २०२०
३) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.मावज-२०२२/प्र.क्र.१२९/कार्या-३४, दि.३१ जानेवारी २०२३
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र.०५/कार्या-१४१४, दि.१३ एप्रिल, २०२३
५) शासन शुद्धीपत्रक नियोजन विभाग क्र. संकीर्ण २०२३ /प्र.क्र.०५/कार्या-१४१४, दि.४ मे, २०२३
६) शासन निर्णय,सा.प्र.वि.क्र. मावज-२०२२/प्र.क्र.१२९/कार्या-३४,दि.१२ एप्रिल,२०२३
७) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.वृत्तचित्र/शासन आपल्या दारी/प्रशा.वित्तीय मान्यता प्रस्ताव/का-७/६५, दि.०८ मे, २०२३

__प्रस्तावना__ :-

नियोजन विभागाच्या दि.१३ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयान्वये शासकीय योजना लोकाभिमुख करुन त्यांची अंमलबजावणी गतिमान करण्यासाठी **‘जत्रा शासकीय योजनांची, सर्व सामान्यांच्या विकासाची’** अभियान राबविण्याचे निश्चित करुन त्याबाबतच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच शासन शुद्धीपत्रक नियोजन विभाग, दि.४ मे, २०२३ अन्वये **‘जत्रा शासकीय योजनांची, सर्व सामान्यांच्या विकासाची’** उपक्रमाचे नाव बदलून **‘शासन आपल्या दारी’** असे नांव देण्यात आले आहे.

‘शासन आपल्या दारी’ उपक्रमाची सर्वसामान्य जनतेस माहिती व्हावी यासाठी वर्तमानपत्रे, दूरचित्रवाणी वाहिन्या, रेडिओ, बाह्य व अन्य माध्यमे, समाज माध्यमे यांसह विविध नवमाध्यमांद्वारे व्यापक प्रसार व प्रसिद्धी करण्यासाठी येणाऱ्या अंदाजित खर्चाचा प्रसिद्धी आराखडा माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत तयार करण्यात आला आहे. सदर आराखड्यानुसार जाहिरात व प्रसिद्धी करण्यासाठी विशेष प्रसिध्दी मोहीम राबविण्याबाबत उक्त संदर्भ क्र.७ येथील माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या दिनांक ८ मे, २०२३ च्या पत्रान्वये प्रस्तावित करण्यात आले आहे.

__शासन निर्णय__:-

**‘शासन आपल्या दारी’** उपक्रमाची जाहिरात निर्मिती, व्यापक प्रसार व प्रसिद्धी करण्यासाठी (अ) विशेष प्रसिध्दी मोहिम व (ब) शासकीय संदेश निर्मिती प्रक्रिया अशा दोन भागांमध्ये प्रसिद्धी आराखडा तयार करण्यात आला आहे. या प्रसिद्धी आराखडयानुसार विशेष प्रसिद्धी मोहिमेअंतर्गत वर्तमानपत्रांमधून DGIPR च्या दराने व उर्वरित अन्य सर्व प्रसिद्धी माध्यमांद्वारे DAVP च्या दराने सर्व शासकीय संदेशांचे प्रसिद्धी व प्रसारण करण्यात येईल. या विशेष प्रसिद्धी मोहिमेकरिता तयार करण्यात आलेल्या प्रसिद्धी आराखड्यास तसेच, सदर

प्रसिद्धी आराखडा राबविण्यासाठी येणाऱ्या अंदाजे **रु.५२,९०,८०,२४०/- (अक्षरी रुपये बावन्न कोटी नव्वद लाख ऐंशी हजार दोनशे चाळीस फक्त )** इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या विशेष प्रसिद्धी मोहिमेसाठी तयार करण्यात आलेल्या प्रसिद्धी आराखड्यानुसार येणाऱ्या अंदाजित खर्चाचा तपशील पुढील विवरणपत्राप्रमाणे राहील:-

| अ) विशेष प्रसिद्धी मोहिम- प्रसिद्धी माध्यमे | | | | |
|---|---|---|---|---|
| **क्र.** | **प्रसिद्धी माध्यम** | **तपशिल** | **कालावधी** | **अंदाजित खर्च** |
| १ | महासंचालनालयाच्या यादीवरील राज्यातील वर्तमानपत्रांद्वारे शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DGIPR ने मान्य केलेल्या दरानुसार उपक्रमाच्या प्रारंभी राज्यव्यापी एक जाहिरात (८००चौ.से.मी.) (मराठी व इंग्रजी)<br>जिल्हानिहाय ३६ जाहिराती (प्रत्येकी ८०० चौ.से.मी.)<br>उपक्रमाच्या समारोपानिमित्त राज्यव्यापी एक जाहिरात (८०० चौ.से.मी.) | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१०,००,००,०००/- |
| २ | वृत्त व मनोरंजनात्मक निवडक मराठी दूरचित्रवाणी वाहिन्यांवरुन शासकीय संदेशाचे प्रसारण | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.३,३०,००,०००/- |
| ३ | आकाशवाणी केंद्रावरुन शासकीय संदेशाचे प्रसारण | केंद्र सरकारचे दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.५६,२५,०००/- |
| ४ | खाजगी एफ.एम. रेडिओ वाहिन्यांवरुन शासकीय संदेशाचे प्रसारण | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,८३,७५,०००/- |
| ५ | कम्युनिटी रेडिओ वाहिन्यांवरुन शासकीय संदेशाचे प्रसारण अथवा राज्यातील केबल टिव्हीद्वारे शासकीय संदेशाचे प्रसारण | DAVP यादीवरील दरानुसार / स्थानिक केबल वाहिन्यांसाठी जुने DAVP दराने व शासन निर्णय, दि.१६.३.२०२० मधील संस्थांमार्फत विहित कार्य पद्धतीचा अवलंब करुन करण्यात येईल. | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.५०,००,०००/- |
| ६ | एसटी महामंडळाच्या बसेसवरील तीनही पॅनेलद्वारे शासकीय संदेशाची प्रसिद्धी | जुने DAVP दरानुसार (ज्या संस्थांकडे अद्यापपर्यंत या माध्यमाचे एकाधिकार (Sole Rights) उपलब्ध असतील त्या संस्थांकरिता) | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,१३,७५,०००/- |
| ७ | रोड शोद्वारे प्रसिद्धी करणे | शा.नि.दि.१६.३.२०२० मधील संस्थांमार्फत विहित कार्य पद्धतीचा अवलंब करुन करण्यात येईल. | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.२,००,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ८ | राज्यातील खाजगी होर्डिंग्जद्वारे आवश्यकता व उपलब्धतेनुसार शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.२,००,००,०००/- |
| ९ | मुंबईतील बेस्ट बसेसला संपूर्ण रॅपद्वारे (wrap) शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील व दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.२,००,००,०००/- |
| १० | डिजीटल वॉल पेंटींगद्वारे संपूर्ण महाराष्ट्रात शासकीय संदेशाची प्रसिद्धी | विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.३,१५,००,०००/- |
| ११ | मुंबई, पुणे, नागपूर व औरंगाबाद विमानतळां-वरुन होर्डिंग / एलईडी मार्फत उपलब्धतेनुसार शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील व दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,००,००,०००/- |
| १२ | माहिती पुस्तक (पूर्ण डिझाईनिंग) | विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,५०,००,०००/- |
| १३ | स्टिकर्स | विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,५०,००,०००/- |
| १४ | माहिती पत्रक | विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,५०,००,०००/- |
| १५ | ऑटो रिक्षा हुडवरुन जाहिरात (पूर्ण महाराष्ट्र) | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.९७,३५,०००/- |
| १६ | पश्चिम रेल्वेच्या २० आणि मध्य रेल्वेच्या ३८ रेल्वे रेकमधील एलसीडीद्वारे शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.५,९१,३२,१६०/- |
| १७ | सीएसएमटी, मुंबई येथील ५९ एलसीडी आणि २०० स्पिकर तसेच पुणे रेल्वे स्टेशनवरील ६५ एलसीडी स्क्रीन आणि १०० स्पिकर द्वारे शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील दरानुसार / उपलब्धतेनुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.३,००,००,०००/- |
| १८ | विमानतळावरील टॅक्सी कॅब (Ola / Uber) द्वारे शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,४१,६०,०००/- |
| १९ | राज्यातील प्रत्येक जिल्हा मुख्यालयातील सिनेमागृह | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.५०,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २० | मुंबई महानगरपालिका रुग्णालयामधून स्क्रिन्सद्वारे शासकीय संदेशाची प्रसिद्धी | DAVP यादीवरील दरानुसार | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.४०,७८,०८०/- |
| २१ | लोकल ट्रेन रॅपद्वारे (wrap) शासकीय संदेशाची प्रसिद्धी | जुने DAVP दरानुसार (ज्या संस्थांकडे अद्यापपर्यंत या माध्यमाचे एकाधिकार (Sole Rights) उपलब्ध असतील त्या संस्थांकरिता) | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.१,००,००,०००/- |
| २२ | समाज माध्यमांद्वारे प्रसिद्धी (३० दिवस) | फेसबुक, व्टिटर, इन्स्टाग्राम, कु आणि अन्य सोशल क्रिएटिव्ह आणि पेड पोस्टींग + ओटीटी आणि डिजीटल प्लॅटफॉर्म + जीओ फेन्सिंग आणि इतर प्लॅटफॉर्म | दि.१८ मे, २०२३ ते १८ जुलै, २०२३ | रु.५,५०,००,०००/- |
| | | | | **रु.५०,६९,८०,२४०/-** |
| | **ब) शासकीय संदेश निर्मिती** | | | |
| | **बाब** | **तपशिल व दर** | **निर्मिती नग** | **रक्कम** |
| २३ | **क्रिएटिव्हस्** | ऑडिओ जिंगल ४५-६० सेकंद डिएव्हीपी दरानुसार (रु.४५,०००/- प्रती जिंगल) | १० | रु.४,५०,०००/- |
| | | प्रिंट क्रिएटिव्ह (रु.१०,०००/- प्रती क्रिएटिव्ह) | १५ | रु.१,५०,०००/- |
| | | टिव्हीसी ४५-६० सेकंद डिएव्हीपी दरानुसार (प्रथितयश कलाकारासह) (रु.२० लाख प्रती टिव्हीसी) | ५ | रु.१,००,००,०००/- |
| | | टिव्हीसी ४५-६० सेकंद डिएव्हीपी दरानुसार (प्रथितयश कलाकारा व्यतिरिक्त) (रु.७ लाख प्रती टिव्हीसी) | १५ | रु.१,०५,००,०००/- |
| | | एका माध्यमातून इतर माध्यमात भाषांतर, रुपांतर अंदाजे खर्च | | रु.१०,००,०००/- |
| **अ) प्रसिद्धी माध्यम व ब) शासकीय संदेश निर्मितीकरिता एकूण अंदाजे खर्च (अक्षरी रुपये बावन्न कोटी नव्वद लाख ऐंशी हजार दोनशे चाळीस फक्त )** | | | | **रु.५२,९०,८०,२४०/-** |

२. प्रसिद्धी आराखड्यासाठी उपरोक्त तक्त्यामध्ये दर्शविण्यात आलेली रक्कम अंदाजित असून एखाद्या माध्यमाव्दारे प्रसिध्दी न झाल्यास सदर माध्यमाची रक्कम उपरोक्त तक्त्यामधील इतर कोणत्याही माध्यमामध्ये आवश्यकतेनुसार वापरण्यास तसेच एखाद्या माध्यमामध्ये बदल करण्यास, तसेच, वरील प्रसिद्धी आराखड्यानुसार कार्यवाही करताना अनुभव आणि क्षमता लक्षात घेऊन माध्यमांची निवड, माध्यमांच्या वापराचा आकार, जाहिरातीचा कालावधी आणि वारंवारीता ठरविण्याबाबतचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांना असतील.

३. प्रस्तुतचा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी, ६०- इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिध्दी (००) (०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहीम (योजनांतर्गत), २६ जाहिरात व प्रसिध्दी (संगणक सांकेतांक क्र.२२२०११७५) या लेखाशीर्षातर्गत सन २०२३-२४ मधील मंजूर अनुदानातून बीम्स प्रणालीवर उपलब्ध तरतुदीच्या मर्यादेत आवश्यक व महत्त्वाच्या बाबींवर करण्यात यावा. सदरहू खर्च त्या त्या प्रयोजनांसाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीमधूनच भागविण्यात यावा. याकरिता कोणताही अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

४. प्रस्तुत शासकीय योजनांच्या विशेष प्रसिद्धी मोहिमेअंतर्गत खर्च करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / आदेश / परिपत्रके यानुसार तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७/०४/२०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील तरतुदींचे / अटी व शर्तींचे पालन करुन तसेच उक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.२६ मार्च, २०२० अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचे तसेच, खरेदी प्रक्रियेबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.१ डिसेंबर, २०१६ च्या तरतुदीनुसार तसेच, अन्य अनुषंगिक शासन निर्णयातील तरतुदींचा तसेच, प्रचलित ई-निविदा प्रक्रिया / CVC निर्देश / CAG मार्गदर्शक तत्वे इत्यादींचे काटेकोरपणे पालन करुन खर्च करण्यात यावा व त्यानुसार विहित केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९९/१४४३, दि.१५/५/२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७१/व्यय-४, दि.१६/५/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१८१५३८५२२६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.05.18 17:50:31 +05'30'

**( रिमा दत्तरॉय )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

९) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) सर्व मा.विधान परिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११) अ.मु.स./प्र.स./सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) सहसचिव, वित्त विभाग (कार्या-व्यय-४),मंत्रालय, मुंबई - ३२.
१३) सहसचिव, नियोजन विभाग (कार्या-१४४३), मंत्रालय, मुंबई-३२
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१५) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१९) लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२०) मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
२१) भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.कुटीर क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०.
२२) भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
२३) राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई -४०० ०३८.
२४) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
२५) बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र.८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४.
२६) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग, मुंबई -४०० ००४.
२७) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३.
२८) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.
२९) निवडनस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग.